**अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांच्या मान्यतेस अनुसरुन, तंत्रशिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील पुणे विभागातील, विद्यमान विनाअनुदानित शैक्षणिक संस्थेतील सध्या सुरू असलेल्या अभ्यासक्रमाच्या नावात बदल करण्यास शैक्षणिक वर्ष २०२५-२६ पासून मान्यता देण्याबाबत...**

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्रशिक्षण विभाग
**शासन निर्णय क्र.मान्यता-२०२५/प्र.क्र.१४७/तांशि-४**
मादाम कामा रोड, हुतात्मा चौक राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
**दिनांक : ०६ जून, २०२५.**

**संदर्भ :-** संचालक, तंत्र शिक्षण यांचे पत्र क्र.२/एनजीसी/AICTE-अभ्यासक्रम नावात बदल/ पुणे/३८१, दि.१५.०५.२०२५.

**प्रस्तावना :-**

अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी दिलेल्या मान्यतेस अनुसरुन, संचालक, तंत्रशिक्षण यांनी उपरोक्त संदर्भाधीन पत्रान्वये, तंत्रशिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील पुणे विभागातील, विद्यमान विनाअनुदानित शैक्षणिक संस्थेतील सध्या सुरू असलेल्या अभ्यासक्रमाच्या नावात बदल करण्यास शैक्षणिक वर्ष २०२५-२६ पासून मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव सादर केला आहे. त्यानुसार मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी दिलेल्या मान्यतेस अनुसरून व संचालक, तंत्र शिक्षण यांनी सादर केलेल्या प्रस्तावानुसार, तंत्र शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील **पुणे विभागातील**, विद्यमान विनाअनुदानित शैक्षणिक संस्थेतील, सोबतच्या **"प्रपत्रामध्ये"** दर्शविलेल्या**,** सध्या सुरू असलेल्या **अभ्यासक्रमाच्या नावात बदल करण्यास** शैक्षणिक वर्ष २०२५-२६ पासून खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती :-**

१) सदर मान्यता कायम विनाअनुदान तत्वावर राहील.
२) प्रस्तुत बाबतीत अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेने विहित केलेल्या तसेच दि.२१ मे, १९८३ च्या शासन निर्णयातील अटींची पूर्तता करणे, संबंधित महाविद्यालय / संस्थांवर बंधनकारक राहील.

३) शासनाने विहित केलेल्या तसेच अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी विहित केलेल्या सर्व अटी व शर्ती मान्य असल्याबाबत संबंधित महाविद्यालय / संस्थेने संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, मुंबई यांच्याशी करारनामा करावा लागेल. तसेच, आवश्यक कागदपत्रांची आणि औपचारिक बाबींची पूर्तता संचालक, तंत्र शिक्षण यांच्या संमतीने समाधानकारकरित्या पूर्ण करावी.

४) संबंधित महाविद्यालय / संस्थेने, संचालक, तंत्र शिक्षण यांचेकडे आवश्यक ती संचित ठेव संयुक्त खात्यात भरुन इतर कायदेशीर बाबींची पूर्तता करावी.

५) सदर अभ्यासक्रमाचे प्रवेश शासनाने मान्य केलेल्या संबंधित अभ्यासक्रमाच्या प्रवेश नियमानुसार / पद्धतीनुसार करण्यात येतील.

६) शुल्क नियामक प्राधिकरणाने विहित केलेल्या शिक्षण शुल्कापेक्षा जास्त शुल्क महाविद्यालयाने आकारल्यास, संबंधित महाविद्यालय / संस्था यांच्यावर महाराष्ट्र एज्युकेशनल इन्स्टिट्युशन (प्रोहिबिशन ऑफ कॅपिटेशन फी) ॲक्ट, १९८७ अनुसार कारवाई करण्यात येईल.

७) संबंधित महाविद्यालय/ संस्थेने अभ्यासक्रम चालविण्यास शिक्षक, शिक्षकेतर व इतर तांत्रिक कर्मचारी अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद, नवी दिल्ली व संबंधित विद्यापीठाच्या निकषाप्रमाणे नियुक्त करावेत. त्यांना नियमानुसार वेतन व भत्ते देण्यात यावेत. तसेच, शिक्षकवृंद व इतर कर्मचाऱ्यांच्या वेतन व भत्ते इ. बाबत तसेच, विद्यार्थ्यांकडून शासनाकडे तक्रारी आल्यास संबंधित महाविद्यालय/ संस्थेवर कडक कारवाई करण्यात येईल.

८) संबंधित महाविद्यालय/ संस्थेने आवश्यक ती पुस्तके, नियतकालिके अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेच्या मानकानुसार खरेदी करणे आवश्यक राहील. तसेच, विद्यार्थ्यांना वाचनालयाचा पुरेपूर उपयोग होण्याच्या दृष्टीने ग्रंथालयात विद्यार्थ्यांना अभ्यासिकेची सोय करणे आवश्यक आहे. तसेच, विद्यार्थ्यांना अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेच्या मानकाप्रमाणे सर्व शैक्षणिक सोयीसुविधा (उदा. प्रयोगशाळा, वाचनालय, वर्गखोल्या इ.) करणे आवश्यक आहे.

९) रॅगिंगसंदर्भात मा.सर्वोच्च न्यायालयाचे निर्देश व महाराष्ट्र प्रोहिबिशन ऑफ रॅगिंग ॲक्ट, १९९९ यांची कठोरपणे अंमलबजावणी करणे संबंधित महाविद्यालय / संस्थेवर बंधनकारक राहील.

१०) संबंधित महाविद्यालय/ संस्थेने सदर अभ्यासक्रम चालविण्यासाठी आवश्यक स्थावर जंगम मालमत्तेकरिता शासनाकडून किंवा कोणत्याही वित्तीय संस्थेकडून घेतलेल्या कर्जाची परतफेड करण्याची सर्वस्वी जबाबदारी संबंधित महाविद्यालय/ संस्थेवर राहील.

११) उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या शासन निर्णय दि.२२.०२.२०१८ अन्वये विहित केलेले नोंदणी शुल्क संबंधित महाविद्यालय / संस्थेने भरणा केले नसेल, तर ते संबंधित सहसंचालक, तंत्र शिक्षण विभागीय कार्यालय यांनी संबंधित महाविद्यालय / संस्थेकडून भरणा करुन घ्यावे.

१२) महाविद्यालय/ संस्थेने संबंधित विद्यापीठाचे संलग्निकरण प्राप्त करुन घेणे आवश्यक राहील.

२. याशिवाय संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई व संबंधित विद्यापीठ यांनी घालून दिलेल्या अन्य अटी व शर्ती संबंधित संस्था / महाविद्यालयावर बंधनकारक राहतील.

३.	या शासन मान्यतेनुसार उक्त संस्था/ महाविद्यालयातील अभ्यासक्रमांचा केंद्रीभूत प्रवेश प्रक्रियेमध्ये समावेश होण्याकरिता संचालक, तंत्र शिक्षण यांनी आवश्यक ते आदेश निर्गमित करावेत.

४.	हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०६०६१८१९४१७६०८ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

THORAT AJITKUMAR ARUNRAO

Digitally signed by THORAT AJITKUMAR ARUNRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=891b9227cbfc5a688b110ab53810ab4d94960474021325e10e794cb784d2e6a9, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F7113210379DB8F8304AC958953787A4C6EC1B3F193419BA4C6971FA4CD5F15E, cn=THORAT AJITKUMAR ARUNRAO
Date: 2025.06.06 18:21:58 +05'30'

**(अजितकुमार थोरात)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३) संबंधित सहसंचालक, तंत्र शिक्षण विभागीय कार्यालय, (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत).
४) कुलसचिव, संबंधित विद्यापीठ (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
५) संबंधित महाविद्यालय / संस्था (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
६) निवडनस्ती/तांशि-४

**प्रपत्र**

**Higher and Technical Education Dept. G.R.No.Manyata-2025/C.R.147/TE-4, Dated : 6th June, 2025**

**List of Course Name Change in Existing Institute,Approved by AICTE from 2025-26**

| Sr. No. | Code | Region | PermanentId | InstituteName | InstituteAddress | District | Institution Type | CourseUniqueId | Program | University | Level | Name of Course - OLD | Name of Course -NEW | IntakeApprovedfor 202425 | IntakeApprovedfor202526 | Variation | CourseAppliedfor |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| 1 | 6610 | PUNE | 1-4259511 | LEXICON MANAGEMENT INSTITUTE OF LEADERSHIP AND EXCELLENCE | LEXICON ESTATE GUT NO 726, PUNE-NAGAR ROAD WAGHOLI | PUNE | Private-Self Financing | 1-9520323634 | MANAGEMENT | NOT APPLICABLE | POST GRADUATE DIPLOMA | PGDM(FINANCE MARKETING AND HUMAN RESOURCE MANAGEMENT) | PGDM (BUSINESS MANAGEMENT) | 180 | 180 | 0 | EoA Only |
| 2 | 6628 | PUNE | 1-5986711 | DATTAKALA GROUP OF INSTITUTIONS | GAT NO. 541/2, 527 OFF.PUNE-SOLAPUR HIGHWAY NO. 9, A/P-SWAMI-CHINCHOLI, TAHSIL - DAUND, DIST-PUNE PIN- | PUNE | Private-Self Financing | 1-11316287951 | ENGINEERING AND TECHNOLOGY | Savitribai Phule Pune University, Pune | UNDER GRADUATE | INFORMATION TECHNOLOGY | ARTIFICIAL INTELLIGENCE (AI) AND DATA SCIENCE | 60 | 60 | 0 | EoA Only |
| 3 | 6797 | PUNE | 1-773561721 | DNYANSHREE INSTITUTE OF ENGINEERING AND TECHNOLOGY | A/P:-SONVADI-GAJVADI, SAJJANGAD ROAD, TAL.-SATARA, DIST.-SATARA. MAHARASHTRA,INDIA | SATARA | Private-Self Financing | 1-2202730449 | ENGINEERING AND TECHNOLOGY | Dr. Babasaheb Ambedkar Technological University, Lonere | UNDER GRADUATE | ELECTRICAL ENGINEERING | ELECTRICAL AND COMPUTER ENGINEERING | 30 | 60 | 30 | EoA & Increase in intake |

प्रपत्र

**Higher and Technical Education Dept. G.R.No.Manyata-2025/C.R.147/TE-4, Dated : 6th June, 2025**

**List of Course Name Change in Existing Institute,Approved by AICTE from 2025-26**

| Sr. No. | Code | Region | PermanentId | InstituteName | InstituteAddress | District | Institution Type | CourseUniqueId | Program | University | Level | Name of Course - OLD | Name of Course -NEW | IntakeApprovedfor202425 | IntakeApprovedfor202526 | Variation | CourseAppliedfor |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| 4 | 6797 | PUNE | 1-773561721 | DNYANSHREE INSTITUTE OF ENGINEERING AND TECHNOLOGY | A/P:-SONVADI-GAJVADI, SAJJANGAD ROAD, TAL.-SATARA, DIST.-SATARA. MAHARASHTRA,INDIA | SATARA | Private-Self Financing | 1-1492888822 | ENGINEERING AND TECHNOLOGY | Dr. Babasaheb Ambedkar Technological University, Lonere | UNDER GRADUATE | CIVIL ENGINEERING | CIVIL & ENVIRONMENTAL ENGINEERING | 30 | 30 | 0 | EoA Only |
| 5 | 6901 | PUNE | 1-2869521941 | MAEER'S MIT COLLEGE OF RAILWAY ENGINEERING AND RESEARCH, BARSHI | LATUR ROAD, MIDC JAMGAON, BARSHI | SOLAPUR | Private-Self Financing | 1-2872820375 | ENGINEERING AND TECHNOLOGY | Solapur University, Solapur | UNDER GRADUATE | MECHANICAL ENGINEERING | MECHANICAL AND RAIL ENGINEERING | 60 | 60 | 0 | EoA Only |

THORAT AJITKUMAR ARUNRAO

Digitally signed by THORAT AJITKUMAR ARUNRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=891b9227cbfc5a688b110ab53810ab4d94960474021325e10e794cb784d2e6a9, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F7113210379DB8F8304AC958953787A4C6EC1B3F193419BA4C6971FA4CD5F15E, cn=THORAT AJITKUMAR ARUNRAO
Date: 2025.06.06 18:22:20 +05'30'